नवीन पोलीस ठाणे अथवा विद्यमान पोलीस ठाणे यांच्या हद्द निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे विहित करणे.

महाराष्ट्र शासन
गृह विभाग
शासन निर्णय क्र.टीटीसी-०३०२/२५४/प्र.क्र.२/पोल-३
मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२
दिनांक- २५ जानेवारी, २००५

वाचा :- महासंचालक व पोलीस महानिरीक्षक महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र क्र.पोमसं/२६/४७/हद्दनिश्चित २००२/दिनांक १२.१०.२००४

प्रस्तावना :-फौजदारी प्रक्रिया संहिता १९७३ (सन १९७४ चा अधिनियम क्र.२ ) च्या कलम २ (एस) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकाराचा वापर करुन शासनामार्फत पोलीस ठाणेचे कार्यक्षेत्र निश्चित करुन तयाची हद्द अधिसूचनेव्दारे प्रकाशित करण्यात येते.तसेच एखादे नवीन पोलीस ठाणे निर्माण केल्यानंतर सदर प्रस्तावित नविन पोलीस ठाणे व मूळ पोलीस ठाणे यांचे कार्यक्षेत्र शासन अधिसूचनेव्दारे सुधारित करण्यात येते . पोलीस ठाणेच्या कार्यकक्षेतील काही भाग तेथील नागरिकांना संपर्काच्या दृष्टीने या अन्य कारणाने गैरसोईचे ठरत असल्यास ते अन्य पोलीस ठाणेस जोडण्याबाबत लोकप्रतिनिधीमार्फत तसेच नागरिकामार्फत निवेदने शासनास प्राप्त होत असतात. तसेच राजयात वेळोवेळी नवीन तालुक्याची निर्मिती व पुनर्रचना करण्यात येते त्यावेळीसुध्दा पोलीस ठाणेच्या हद्दीत सुधारणा करणे आवश्यक ठरते. पोलीस ठाण्यांच्या हद्दी निश्चित करणेबाबत शासनास फौजदारी प्रक्रिया संहितेच्या कलम २(एस) अन्वये अधिकार प्रदान करण्यात आले आहेत. हे जरी खरे असले तरी पोलीस ठाणेच्या हद्दी निश्चित करण्या संदर्भात निश्चित मार्गदर्शक तत्वे अस्तित्वात नसल्याने पोलीस महासंचालक यांचे कार्यालयामार्फत प्राप्त प्रस्तावांची छाननी करणे व त्यावर शासनाचे अभिप्राय नोंदवणे कठीण होते. त्यामुळे पोलीस ठाण्याच्या हद्दी निश्चित करण्यासाठी मार्गदर्शक तत्वे विहित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

शासन निर्णय :- उपरोक्त प्रस्तावाचा साकल्याने विचार करुन नवीन पोलीस ठाणे अथवा विद्यमान पोलीस ठाणे यांच्या हद्दी निश्चित करताना यापुढे खालील मार्गदर्शक तत्वे विचारात घेण्यात यावी असा निर्णय शासनाने घेतला आहे:-

१) विविध पोलीस ठाण्याच्या हद्दी निश्चित करताना पोलीस ठाण्याच्या अधिपत्याखालील भौगोलिक क्षेत्र व संबंधित महसुली तालुका व मतदारसंघनिहाय सुलभ व्हावे असे असावे.तसेच शक्यतो तालुक्यातील गावे तालुक्यातील पोलीस ठाण्यात समाविष्ट असावीत.

२) जनतेला पोलीस ठाण्याची सेवा किमान अंतरावर प्राप्त होईल असे पहावे. याबाबत नागरिक व लोकप्रतिनिधी यांची निवेदने विचारात घ्यावेत पोलीस ठाण्या अंतर्गत असलेले पोलीस दूरक्षेत्र हे सर्वसाधारणपणे गांवापासून ७ ते ८ कि.मी इतक्या अंतरावर असावीत. शहरामधील पोलीस चौकी महत्वाच्या रहदारीच्या ठिकाणी व हमरस्त्यावर असावीत.

३) एखाद्या पोलीस ठाण्याच्या हद्दीत समाविष्ट होणारी गावे ही सलग क्षेत्रात विस्तारलेली असावीत.

४) शासनाकडून वेळोवेळी नवीन तालुके व जिल्हयाची पुनर्रचना करण्यात येत असते ही बाब विचारात घेऊन पोलीस ठाण्याची सुधारित हद्द निश्चित करावी.

५) पोलीस ठाण्याची हद्द निश्चित करताना स्थानिक ,भौगोलिक व औद्योगिक वसाहत इत्यादी गोष्टी विचारात घ्याव्यात.

६) पोलीस ठाण्याच्या हद्द निश्चितीस संबंधित जिल्हयाचे जिल्हाधिकारी व संबंधित स्थानिक प्रशासन यांची संमती घेण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( क. गो. देशपांडे )
उप सचिव,महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

पोलीस महासंचालक महाराष्ट्र राज्य,मुंबई.
सर्व पोलीस आयुक्तालये,
सर्व विशेष पोलीस महानिरीक्षक,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व पोलीस अधीक्षक,
महसूल व वन विभाग,
निवड नस्ती (पोल-३)